

PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

वाचन पातळी ३

# अतिशहाणा गस

**Author:** Veena Seshadri
**Illustrator:** Greystroke
**Translator:** Utkarsha Manish

फार पूर्वी गस नावाचा एक शेतकरी  होता. तो नेहमी उदास असे आणि चिडचिड करत असे. त्याची बायको मात्र त्याच्यासारखी नव्हती. ती खूप मेहनती आणि आनंदी होती. पण तिरसट गस तिच्यामध्ये काहीना काही दोष शोधून काढत असे. त्याला वाटे की ती मूर्ख आहे आणि कोणतेच काम बरोबर करू शकत नाही. एके दिवशी संध्याकाळी तिरसट गस शेतावरून अगदी वैतागून परत आला. त्याची बायको कामात असल्यामुळे
दरवाजा ठोठावल्यावर तो उघडायला थोडा उशीर झाला.

पिसाळलेल्या कुत्र्यासारखी गसची अवस्था झाली. तो बायकोच्या अंगावर खेकसला, बाळालाही ओरडला आणि त्यानं कुत्र्याच्या शेपटीवरही पाय दिला. दात विचकत, चिडचिड करत तो मोठ्यामोठ्याने ओरडत होता. ओरडून ओरडून तो दमला, तेव्हा त्याची बायको म्हणाली, "काय हे ! का असा गोंधळ घालता? उद्या मी शेतावर जाते, तुम्ही माझी घरची कामं करा. बघा तुम्हाला पटतं का?"

"छान कल्पना आहे," गस म्हणाला. त्याला वाटलं तो खूप हुशार आहे आणि यानिमित्तानं तो आपल्या बायकोला चांगला धडा शिकवू शकेल.

"मी तुला दाखवेन कामं कशी करतात ती!"
दुसऱ्या दिवशी सकाळी त्यानं आपल्या बायकोला शेतावर कामाला पाठवलं. अर्थातच तो घरी राहिला. तो लोणी काढण्यासाठी ताक घुसळायला लागला. लवकरच त्याला कळलं, वाटतं तितकं हे काम सोपं नाही. शिवाय, त्या कामानं त्याला तहानही लागली. म्हणून तो सातुची दारू घेण्यासाठी तळघरात गेला. त्याने दारूच्या पिंपाचा नळ उघडला इतक्यात त्याला वरती स्वयंपाकघरात डुक्कर घुसल्याचा आवाज आला.

"हट! हट! ते उपद्रवी डुक्कर बहुतेक लोणी काढायच्या भांड्याजवळ असेल... आणि चट्चट् चाटतअसेल...  त्याला असा धडा शिकवतो की तो आयुष्यात कधी विसरणार नाही," तणतणत गस म्हणाला.

नळ बंद न करताच तसाच तो ओरडत धावत वर गेला.

"हट, हट, हट." पण गस वरती पोहचेपर्यंत खूप उशीर झाला होता. डुकरानं ते भाडं उलटं केलं होतं आणि डूरऽ डूरऽऽ करत सांडलेल्या लोण्याचा ते मजेत स्वाद घेत होतं.

गसनं त्याला इतक्या जोरात लाथ मारली की, ते डुक्कर चक्क मरून पडलं! तेवढ्यात त्याच्या लक्षात आलं की, त्यानं तळघरात पिंपाचा नळ उघडा ठेवला आहे. तो धावत खाली आला.

अरेरे, उशीर झाला होता! पिंपातली सर्व दारू संपली होती. त्याचा घसा कोरडा पडला होता. धापा टाकत तो वरखाली करत होता.

तेवढ्यात त्यानं गाईचं हंबरणं ऐकलं.
त्याला गाईकडे लक्ष द्यायला वेळच मिळाला नव्हता!



त्यानं तिला चारा किंवा पाणीही दिलं नव्हतं. पण तिला खाली कुरणाकडे चरायला घेऊन जायचा त्याला कंटाळा आला होता. त्याला आठवलं की घराच्या छतावर थोडं गवत उगवलं आहे. त्याचं घर उभ्या चढाच्या टेकडीजवळ होतं. त्याला वाटलं तो गाईला लाकडाच्या फळीच्या सहाय्यानं छतावर घेऊन जाऊ शकेल.

पण आता छोटं बाळ स्वयंपाकघराच्या जमिनीवर रांगत आलं होतं.
अजूनही थोडसं ताक भांड्यात राहिलं होतं.
आता बाळानं राहिलेलं ताक सांडू नये, असं गसला वाटलं. म्हणून ते भांडं त्यानं पाठीवर घेतलं आणि तो बाहेर गेला.

गाईला छतावर चढवण्याआधी गसने तिला थोडं पाणी दिलं होतं. गस ज्यावेळी विहिरीतून पाणी काढायला वाकला तेव्हा आणखी एक अडचण निर्माण झाली.
खांद्यावरच्या भांड्यातलं सर्व लोणी त्याच्या खांद्यावर आणि डोक्यावर सांडलं. अगदी डोळ्यात, नाकात आणि कानातसुद्धा गेलं आणि भांडं विहिरीत पडलं!

आता दुपारच्या जेवणाची वेळही टळून गेली होती. त्याचं कुठलंच काम आतापर्यंत संपलं नव्हतं. खूप मोठी यादी होती. न झालेल्या कामाचा विचार करायचासुद्धा त्याला कंटाळा आला होता. गाईला छतावर चढवेपर्यंत बाळाला खूप भूक लागली होती.

ते मोठ्यामोठ्यानं रडू लागलं "उव्हॅऽऽऽ उव्हॅऽऽऽ उव्हॅऽऽऽ" म्हणून गसनं खीर करायचं ठरवलं. विस्तव पेटवला आणि विस्तवावर भांडं ठेवून त्यात खिरीसाठी पाणी ओतलं. त्याच्या मनात एक भीतिदायक विचार आला.

छत उभ्या चढणीचं होतं. त्यावरून गाय घसरून पडली तर? तिचा पाय आणि कदाचित मानही मोडेल! म्हणून तो गाईला बांधायला छतावर गेला. दोराची एक बाजू त्याने गाईच्या गळ्याभोवती बांधली. दोराची दुसरी बाजू छतावर बांधायला खुंटी नव्हती.

म्हणून त्यानं स्वयंपाकघराच्या धुराड्यातून तो दोर खाली सोडला मग तो परत स्वयंपाकघरात गेला आणि तो दोर आपल्याच पायाला बांधला. भांड्यातलं पाणी उकळत होतं. त्यानं खीर बनवायला घेतली. त्याच वेळी गाईचा तोल गेला आणि ती पडू लागली!

आता गाय तर खूप वजनदार होती, धष्टपुष्ट होती. गस, त्याची बायको, त्यांचं बाळ आणि कुत्रा या चारही जणांना एकत्र केलं असतं तरीसुद्धा गाईचं वजन जास्त होतं. गाय छतावरून हळूहळू सरकत खाली येत होती. तिच्याबरोबर दुसऱ्याबाजूनं तो दोर वर खेचला जात होता आणि गसने तर दुसरी बाजू आपल्या पायाला बांधली होती! म्हणून तो धुराड्यापर्यंत खेचला गेला आणि तो ना धड वर जाऊ शकत होता ना धड खाली येऊ शकत होता. बायको येईपर्यंत तो तसाच तिथे होता.

तिनं गाईला लटकत असलेलं पाहिलं. गाय सुटण्यासाठी धडपड करत होती. म्हणून गसच्या बायकोनं पटकन दोर कापला आणि गाय धपकन जमिनीवर पडली आणि घरात गस गडगडत खाली आला आणि बिचाऱ्याचं डोकं त्या खिरीच्या भांड्यात घुसलं! आणि त्यानंतर काय झालं असेल? आयुष्यात कधीही गसनं बायकोला धडा शिकवायचा विचार केला नाही!

## स्वत:चं वायकिंग जहाज तयार करा

जवळ जवळ 1200 वर्षांपूर्वी, वायकिंग (समुद्रलुटारू) हे नॉर्वेतून आले. ते उत्तम प्रवासी होते. त्यांनी आपल्या जहाजांतून युरोप आणि अटलांटिक समुद्रसफरी केल्या. तुम्हाला आवडेल तुमच्या स्वत:च्या वायकिंग जहाजावर साहसी प्रवास करायला?

**लागणारे साहित्य:**

l कार्ड पेपर

l झाडूची काडी

l डिंक

l पोस्टर कलर किंवा पाण्याचे रंग

l ब्रश

l कात्री

l मोजपट्टी

l पेन्सिल

l एका जुन्या काडीपेटीच्या खोक्यात  काही छोटे-छोटे दगड


1


2



3



4

**जहाज तयार करा (चित्र मागच्या पानावर)**

1. कार्ड पेपरचा अर्धा तुकडा घ्या. त्याला चित्रात दाखवल्याप्रमाणे जहाजाच्या गलबताप्रमाणे कात्रीनं कापा आणि रंगवा.
2. चित्रात दाखवल्याप्रमाणे कार्ड पेपरच्या तुकड्यावर जहाजाच्या गलबतासारखी बाह्यरेखा (आऊटलाईन) कात्रीनं कापा आणि रंगवा.
3. चित्रात दाखवल्याप्रमाणे आतल्याबाजूस दुमडा.
4. पुढचा भाग आणि मागचा भाग













## जहाजाचं शीड तयार करा

1. शिडाला दोन भोके पाडा. त्या भोकातून एक झाडूची काडी घुसवा. चित्रात दाखवल्याप्रमाणे काडीला मागच्या व पुढच्या बाजूला सरकवा.

2. काड्यापेटीच्या मध्यभागी भोक पाडून त्यात ती झाडूची काडी डिंकाने चिकटवा.

3. आता ती काड्यापेटी जहाजाच्या आत मध्यभागी चिकटवा.

4. चित्रात दाखवल्याप्रमाणे संरक्षक ढाली जहाजाच्या बाहेरच्या बाजूला चिकटवा. झाली प्रवासाची तयारी.

तुमचं वायकिंग जहाज सात समुद्रांचा प्रवास करायला तयार आहे.

PRATHAM BOOKS
storyweaver



## Story Attribution:

This story: अतिशहाणा गस is translated by Utkarsha Manish . The © for this translation lies with Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'The Man Who Thought He Was Smarter Than His Wife: A Folktale From Norway', by Veena Seshadri . © Pratham Books , 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: A scared man with multiple thoughts, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: A worried man with a smiling woman, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: A man kicking a pig, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: A brown cow thinking of grass, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: A frightened man with too many thoughts, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 12: A man hanging down from a chimney with a rope tied around his foot, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 14: Craft: making a ship, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 15: How to make a ship, by Greystroke © Pratham Books, 2006. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# अतिशहाणा गस
(Marathi)

फार फार वर्षांपूर्वी नॉर्वेमध्ये एक गस नावाचा कटकट्या, चिडचिड्या स्वभावाचा, तिरसट, शेतकरी राहत असे. तो नुसता कटकट्या नव्हता, तर तो अतिशहाणा आणि उद्दामही होता. तो इतरांपेक्षा स्वत:ला फार शहाणा समजत असे, विशेषत: आपल्या बायकोपेक्षा. तो खरंच का एवढा हुशार होता हे जाणण्यासाठी नॉर्वेमधली ही मनोरंजक आणि मजेदार लोककथा वाचा!

या पुस्तकाची वाचन पातळी ३ आहे. आपले आपण वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

